मौजा इंदोरा येथील खसरा क्र.३५,२८/४, जागा उपकेंद्र (सब स्टेशन) करीता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या. यांना वाटप करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्रमांक-नासुप्र-१६२१/प्र.क्र.११३/नवि-२६**
**नगर विकास विभाग,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २९ ऑगस्ट,२०२३.

**वाचा :-** कार्यकारी अधिकारी, नागपूर सुधार प्रन्यास यांचे दि.२३.१२.२०२२ चे पत्र.

**प्रस्तावना:-**

नागपूर सुधार प्रन्यासच्या मालकीची खसरा क्र. ३५, २८/४, मौजा इंदोरा येथील उपकेंद्र (सब स्टेशन) करीता आरक्षित जागेपैकी १००० चौ.मि. जागा महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या. (MSEDCL) ला उपकेंद्र (सब स्टेशन) उभारण्याकरीता मोबदला न घेता वाटप करणेबाबत नागपूर सुधार प्रन्यास विश्वस्त मंडळ ठराव विश्वस्त मंडळ ठराव क्र.१०/१२०६/ दि.१६.११.२०२२ अन्वये पारित केला आहे. यानुसार शासकीय उपक्रम असल्याने ३३ के.व्ही. उपकेंद्राच्या उभारणीकरीता नागपूर सुधार प्रन्यास जमिन विनियोग नियम १९८३ मधील नियम ५ (२) अंतर्गत महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या. (MSEDCL) यांना विना मोबदला वाटप करण्यास नियम २६ अंतर्गत शिथिलता प्रदान करण्यात यावी, अशी विनंती नागपूर सुधार प्रन्यासद्वारे करण्यात आली आहे. या विनंतीस तसेच नागपूर सुधार प्रन्यास जमिन विनियोग नियम १९८३ मधील नियम ८ व ९ ला अनुसरुन आवश्यक मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

अ) नागपूर सुधार प्रन्यास जमीन विनियोग नियम, १९८३ च्या नियम २६ अन्वये राज्य शासनास प्राप्त अधिकारानुसार खसरा क्र.३५, २८/४, मौजा इंदोरा येथील उपकेंद्र (सब स्टेशन) करीता आरक्षित जागेपैकी १००० चौ.मि. जागा नियम ५ (२) ला शिथीलता प्रदान करुन महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या. (MSEDCL) यांना उपकेंद्र (सब स्टेशन) उभारण्याकरीता थेट वाटप करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

आ) राज्य शासनास नागपूर सुधार प्रन्यास जमिन विनियोग नियम १९८३ मधील नियम २६ नुसार प्राप्त अधिकारान्वये सदर जागेचे वाटप करतांना केवळ एक वेळची विशेष बाब म्हणून नियम ८ व ९ ला शिथीलता देवून जमिनीचे अधिमुल्य (प्रव्याजी रक्कम रु.२,१८,५०,०००/-) अथवा जमिनीचे भूभाडे यास्वरुपातील कोणताही "विना मोबदला" वाटप करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०८२९११५८२८४५२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2023.08.29 12:00:36 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (गृह, विधि व न्याय) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
५) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई